Maharashtra Engineering Services Examination 2007-Appointment of Assistant Engineer Group B Grade-2 (Civil)

**महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा २००७ मधील सहायक अभियंता गट-ब श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावरील नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
जलसंपदा विभाग,
शासन आदेश क्रमांक : नियुक्ती १०१०/(प्र.क्र.३३/२०१०)/(१)/आ(सअश्रे-२)
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ५ नोव्हेंबर, २०११.

**आदेश**

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा २००७ सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट-ब या पदावरील नियुक्तीसाठी सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांनी दिनांक ८ फेब्रवारी, २०१० च्या पत्रान्वये, सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावर नियुक्तीसाठी २६६ उमेदवारांची शिफारस प्राप्त झाली होती. सदर यादीतील ज्या उमेदवारांनी नियुक्ती स्वीकारलेली नाही अशा उमेदवारांची नांवे वगळण्यात आली आहेत व त्याच्या ऐवजी आयोगाने दिनांक ३०.०५.२०११ च्या पत्रान्वये प्रतिक्षायादीतील ४२ उमेदवारांची सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावर नियुक्तीसाठी केलेल्या शिफारशींनुसार, परिशिष्ट-अ मधील २५ उमेदवारांच्या नियुक्तीसाठी आवश्यक पडताळणी अहवाल शासनस्तरावर मागविण्यात आले असून सदर अहवालानुसार त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच परिशिष्ट-२ मधील उमेदवारांची मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्ती करण्यात येत आहे. सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची जलसंपदा विभागात ते रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) म्हणून रुपये ९३००-३४८०० + ग्रेड पे रु. ४४०० या वेतनश्रेणीत नियुक्ती करण्यात येत आहे.

२. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२(स्थापत्य) मधील जलसंपदा विभागातील पदस्थापना ही अंतिम असून त्यात बदल होणार नाही. व त्यांच्या नावासमोरील स्तभ ६ मध्ये नमूद केलेल्या विभागात/कार्यालयात नियुक्ती करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ गट-ब मधील उमेदवारांची नियुक्ती ही दोन वर्षाचा परिविक्षाकाळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित शर्तीच्या अधीन असेल व त्यानंतर त्यांना या विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट-ब च्या उपलब्ध पदावर तात्पुरती नेमणुक देण्यात येईल व योग्य वेळी ती नियमित करण्यांत येईल.

अ) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांनी प्रतिक्षायादीतून नियुक्तीसाठी शिफारस केल्याने दिनांक ८.२.२०१० व दि.१८.११.२०१० च्या मूळ शिफारस यादीतील शेवटचे उमेदवार श्रीमती चरडे प्रेरणा विठ्ठलराव (एन.जी.-००२४०८) अ.क्र. २७१ यानंतर परिशिष्ट-अ मधील उमेदवारांचा जेष्ठताक्रम राहील. प्रतिक्षा यादीतील उमेदवाराचा गुणवत्ताक्रम अगोदर असले तरी महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियम) नियमावली १९८२ मधील कोणतेही नियम लागु नाही. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची वर दर्शविलेल्या शर्तीवर महाराष्ट्र शासनाच्या सेवेत सविस्तर नियुक्ती मिळण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक/मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व कामावर रुजू व्हावे.

ब) उमेदवारांने नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्यांच्या आत त्यांच्या नमेणूकीच्या ठिकाणी रुजू झाले पाहिजे. अन्यथा एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रुजू होणा-या अभियंत्यास रुजू करुन घेवू नये.

क) विहित कालावधीत काही अपरिहार्य, उचित कारणास्तव त्यांना रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास उमेदवारांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात अर्ज सादर करुन त्यांनी शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे.

ड) संबंधित मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता यांना असे कळविण्यात येते की, परिशिष्ट-अ मधील उमेदवारांच्या नियुक्तीचे कार्यालय/पदस्थापना दर्शविलेल्या ठिकाणी पदास्थापनेचे सविस्तर आदेश उमेदवारांनी जाहीर केलेला जिल्हा वगळून या आदेशाच्या दिनांकापासून ३ दिवसांत काढावेत व त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ पाठविण्यात यावा. तसेच, सदर आदेशान्वये नियुक्ती दिलेल्या उमेदवारांना रुजू करुन घेण्यापूर्वी त्यांची शैक्षणिक अर्हतेची मुळ कागदपत्रे पाहून रुजू करुन घ्यावेत.

४. परिशिष्ट-अ मधील मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांच्या जातीचा दावा संबधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीने वैध ठरविला असून त्याबाबतचे वैधता प्रमाणपत्र शासनास प्राप्त झाले आहे.

५. वरील परिच्छेद ३ (अ) महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ मध्ये प्रतिक्षायादीतील नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांच्या आपआपसातील ज्येष्ठता राहील. तसेच उमेदवारांच्या विभागांतर्गत त्यांची जेष्ठता व आयोगाने शिफारस केलेल्या अन्य उमेदवारांची विभागातील एकत्रित ज्येष्ठता ही मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायप्रविष्ठ असलेल्या याचिका क्र.७४१४/०३, ७४१५/०३ व ८६०७/०३ व मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल विशेष अनुमती याचिका क्रमांक १००८३/२०१० या न्यायालयीन प्रकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून ठरविण्यात येईल.

६. आवश्यकता भासल्यास परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

७. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा तिला भाषा परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

८. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी शासनाने विहित केलेली संगणक परिक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल तर शासनाने विहित केलेली संगणक परीक्षा या संबंधी असलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करावी लागेल.

९. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्यांना शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/ प्र.क्र.३३/ ९२/८, दिनाक २/१२/९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

१०. संबधित अधीक्षक अभियंता यांनी सेवेत दाखल होणाऱ्या उमेदवारांचे ते हजर झाल्याचा दिनांकाचा अहवाल शासनाला तात्काळ सादर करावा.

११. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी ३० दिवसांच्या मुदतीत/विहित कालाधीत हजर/रुजू न झाल्याबाबतचा अहवाल संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता किंवा कार्यालय प्रमुख यांनी शासनाला पुढील कार्यवाहीसाठी सादर करावा.

१२. संबंधित अधिकाऱ्यांनी उमेदवार रुजू झाल्यानंतर त्यांची वैयक्तिक माहिती आवश्यक त्या प्रमाणपत्राच्या प्रतीसह (२ प्रती) शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ १२६५/डी-१/२९/११/६५ अनुसार शासनास पाठवावी. तसेच फॉर्म क्रमांक पार्ट एफजीईएन २५४/(सी)(आऊटर कव्हर) मध्येही दोन प्रतीत माहिती शासनास पाठवावी.

१३. परिशिष्ट-अ मधील उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी याबाबत संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता व शासनास कळवावे.

१४. संबंधित अधीक्षक अभियंतांनी परिशिष्ट-अ मधील उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी संपण्याच्या एक महिना अगोदर त्यांचे परिविक्षाधीन काळातील विशेष मुल्यनिर्धारण अहवाल शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०६२/डी, दिनांक २६/४/६२ मध्ये विहित केलेल्या नमुन्यात तीन प्रतीमध्ये शासनास पाठवावेत.

१५. परिशिष्ट-अ मधील उमेदवार जर सध्या जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा शासनाच्या इतर विभागात काम करीत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने पुरेसे अगोदर कार्यमुक्त करावे. तसेच नियुक्तीधारक उमेदवार इतरत्र कार्यरत असल्यास सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र संबंधित अधीक्षक अभियंता यांना सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

१६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१/१०/२००५ अन्वये उमेदवाराना नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल, भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंनियो १००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरीसेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

१७. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी विहित विभागीय परीक्षा परिविक्षाधीन कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच परिविक्षाधीन कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास किंवा कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा त्यांचे काम योग्य अथवा अनुरुप न आढळल्यास त्यांच्या सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द् करण्यात येतील.

१८. नियुक्ती दिलेल्या कार्यालयात हजर झाल्यानंतर त्यांनी तात्काळ सोबतचे पत्र संबधित मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता यांच्या स्वाक्षरीसह या विभागाकडे पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारलेली नाही असे समजून योग्य ती कार्यवाही केली जाईल.

१९. विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/बदली/नियुक्ती मिळविण्यासाठी खासदार/आमदार/लोकप्रतिनिधी/खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

२०. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११११०५१६३०२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( मु.नि.धुरी)**
**शासनाच्या अवर सचिव**

प्रत,
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
महालेखापाल-१(लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-१(लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)
प्रधान सचिव(जलसंपदा),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.

सचिव(लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, गोदावरी मराठवाडा नदी खोरे अभिकरण, औरंगाबाद,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृष्णा नदी खोरे अभिकरण, पुणे,
व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ नदी खोरे अभिकरण, नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, कोकण नदी खोरे अभिकरण, ठाणे,
व्यवस्थापकीय संचालक, तापी नदी खोरे अभिकरण, जळगांव,
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक,
महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद,
मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक,
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
मा.मंत्री (जलसंपदा व लाक्षेवि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
मा.मंत्री (जलसंपदा/कृष्णा खोरे महामंडळ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (जलसंपदा व लाक्षेवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन आ(ज्येष्ठता)/आ(तांत्रिक),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
संबधित उमेदवार श्री/श्रीमती.
आ(स.अ.श्रे.-२) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन आदेश क्रमांक : नियुक्ती १०१०/(प्र.क्र.३३/२०१०)/आ(सअश्रे-२) दिनांक ५ नोव्हेंबर, २०१११ चे सहपत्र.**

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | उमेदवारांची नांवे व पत्ता | गुणवत्ता क्रमांक | प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | नियुक्तीचा विभाग/पदस्थापनेचा ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| १. | गुंड अमोल पंढरीनाथ (औंदुबर श्रीकृष्ण नगर,दळवी मळा,शिला विहार जवळ,पाईपलाईन रोड,अहदमनगर | ४७४ | खुला | खुला | कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद/मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद/अधिक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद. |
| २. | काकडे प्रशांत उदधवराव (बी-३, केसापुरी कँप, माजलगाव,बीड) | ४९२ | खुला | खुला | अधिक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत उपविभाग, अहमदनगर |
| ३. | सुर्यवंशी अमोल रावसाहेब (विवेकानंर चौक, विवेकानंद नगर, एकॉनॉमिक प्राडक्टस्, मारुती मंदिराच्या बाजूला, लातूर-) | ५०३ | खुला | खुला | कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद /मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद/अधिक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद. |
| ४. | पवार शरदकुमार हिंदुराव (चाचेगांव ता.कराड, जि.सातारा) | ५३१ | खुला | खुला | कार्यकारी संचालक,कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे/अ.अ. उतर कोकण पाटबंधारे मंडळ, ठाणे(रायगड जिल्हा) |
| ५. | मोरे सचिन तुकाराम (मिलन निवास, ८६२, सर्वे नं.३१, गोशनगर, धनकवडी, पुणे) | ५४८ | खुला | खुला | मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे/अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा |
| ६. | पालवे मिलिंद अशोक (वर्धमान वाटीका, तत्वज्ञान विद्यपीठ रेस्ट-१ फेस, अे.विंग ५०२, कापूरबावडी, ठाणे) | ५८५ | अजा | अ.जा. | व्यवस्थापकीय संचालक, तापी नदी खोरे अभिकरण,जळगाव /अ.अ. नाशिक पा.प्र.मंडळ, धुळे |
| ७. | हसनाळे योगेश रामचंद्र, शिवसेना निवास, अयोध्या नगर, पाईप लाईन,अहमदनगर | ५८६ | अजा. | अ.जा. | कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद/मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद/अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकारण, औरंगाबाद. |
| ८. | दुपारे सचिन जनार्दन (अंबेकरण लेआऊट, घुटकला पार्क, शाही मसदीजजवळ,चंद्रपूर) | ५८८ | अ.जा. | अ.जा. | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /अधिक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर/गडचिरोली पाटंबधारे विभाग, गडचिरोली |
| ९. | शिंदे धनंजय हरीभाऊ (झाडगांव पोस्ट मोहरी ता.मंगरुळपीर, जि.वाशिम | ५९० | इमाव | इमाव | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /मुख्य अभियंता, (वि.प्र.) जलसंपदा विभाग, अमरावती/अ.अ. बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा. |
| १०. | थाटे उषा अर्जुन (फ्लॅट नं१, वैष्णवी पॅलेस गुरुनानक फर्निचरजवळ, शितोळे नगर, पुणे) | ५९४ | अजा | अजा | कार्यकारी संचालक,कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे/अ.अ.खारभूमी विकास महामंडळ,ठाणे (रायगड जिल्हा) |
| ११. | बागुल मिलिंद श्रीराम (२८ बीजली नगर, नाकणे रोड, देवपूर, धुळे) | ५९५ | अजा | अजा | व्यवस्थापकीय संचालक, तापी नदी खोरे अभिकरण,जळगाव /अ.अ. जळगांव पा.प्र.मंडळ, जळगाव. |
| १२. | नागदिवे प्रणय अभिमन्यु (फ्लॅट नं४३/०५, वैशाली नगर, नागपूर) | ६०० | अजा | अजा | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /अधिक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर/गडचिरोली पाटंबधारे विभाग, गडचिरोली |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३ | ससाणे सुदेश देवराव (व्दारा:डी.बी.गाडे, सिध्दार्थ नगर, सिव्हील लाईन, शिवाजी नगर, अमरावती) | ६०१ | अजा | अजा | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती/अधिक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ. |
| १४. | मगरे अभय पांडुरंग (व्दाराः संजय बांरगळे, ,सुयोग कॉलनी, प्लॅट नं १२/२४, शाहुपुरी हायस्कुल, सातारा) | ६१६ | भजब | भजब | कार्यकारी संचालक,कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे/अ.अ.उत्तर कोकण पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गत रायगड जिल्हयात |
| १५. | पुजारी मुग्धा रमेश (सावरकर कॉलनी, विश्रामबाग, सांगली) | ७१८ | खुला महिला | खुला माहिला | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे/अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे. |
| १६. | पाटील नम्रता नरेंद्र (२०७८/ई, प्लॅट न. फ-२ ,हार्मोनी अपार्टमेंट, ९बी लेन, राजारामपुरी, कोल्हापूर) | ७२९ | खुला महिला | खुला माहिला | मुख्य अभियंता (स्थापत्य) जलविद्युत प्रकल्प, पुणे/अ.अ. कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे |
| १७ | पांडे आरती एकनाथ (३४,साई मंदीरच्या बाजूला,अयोध्या नगर, नागपूर) | ७३८ | खुला महिला | खुला माहिला | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर/अधिक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर/वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा. |
| १८.. | झिरपे शुभदा सुरेश (व्दारा:चिपडे विवेकानंद महादेव, १९८६, औंदुबर छाया,दाने गल्ली, महाजन लेन, बार्शी,सोलापूर) | ७४० | खुला महिला | खुला माहिला | कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद/मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद/ अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद |
| १९. | शेख समरीन शब्बीर (८,शिवाजी हौसिंग सोसायटी,रेमंड होम जवळ, सातारा) | ८७२ | खुला महिला | खुला माहिला | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे/मुख्य अभियंता, (विप्र) जलसंपदा विभाग, पुणे/अधीक्षक अभियंता, कुकडी पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे |
| २०. | प्रसाद आरती देवेंद्र (योगलम्क्षी अपार्टमेंट, ब्लॉक सी, प्लॅट नं.३०८,मोदी नं.१,सिताबर्डी, नागपूर) | ७९६ | खुला महिला | खुला महिला | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर/अधिक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ, नागपूर |
| २१. | खोत विपुल ज्ञानेश्वर (नक्षत्र दत्तमंदीर रोड, धर्मराज पार्क, पार्कजवळ, विश्रामबाग, सांगली) | ८५६ | भ.ज.क | भ.ज.क | मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्त.) पुणे/.अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्त.) विभाग, कोल्हापूर. |
| २२. | चव्हाण सुरज नंदू (माहेरघर, पॉवार लाईन जवळ, माईची लेआऊट, वॉर्ड नं.२०,बुलढाणा) | ९०७ | वि.जा.अ. | वि.जा.अ. | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर /मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर |
| २३. | फाये प्रिती हरीदास, न्युफुटला, अमरावती रोड, कार्पोरेशन लाईब्ररीच्या बाजूला, लक्ष्मी किराणाच्या जवळ, नागपूर. | ९७८ | इमाव महिला | इमाव महिला | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर/ अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर |
| २४. | जांभुळकर मेघना शिवलाल (प्लॅट नं. ३१२, सोराज ज्वेलर्स, कानजी हाऊस रोड, बीनाकी, मंगळवारी, नागपूर) | १०३५ | अ.जा महिला | अ.जा. महिला | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर/ अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर |
| २५. | जाधव मिना मारुती ओंकार, प्लॅट नं.४३, विजयनगर वालनेसवाडी, सांगली | १०४३ | अ.जा महिला | अ.जा. महिला | कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे/.अ.अ.खारभूमी विकास महामंडळ, ठाणे (रायगड जिल्हा) |

मुनिधुरी

**( मु.नि.धुरी)**
शासनाच्या अवर सचिव

# प्रपत्र

परिशिष्ट क्रमांक :-
आदेशातील अनुक्रमांक :-

प्रति,
कक्ष अधिकारी,
जलसंपदा विभाग/कार्यासन-आ(सअश्रेणी-२),
मंत्रालय, मुंबई ३२

महोदय,
शासन आदेश क्रमांक : नियुक्ती १०१०/(प्र.क्र.३३/२०१०)/(१)/आ(सअश्रे-२), दिनांक ०५/११/२०११ चे मिळाले, मी नियुक्तीच्या कार्यालयात दिनांक रोजी रुजू झालो / झाले आहे.

आपला,

( )

सही /-
मुख्य अभियंता / अधिक्षक अभियंता